**परिस स्पर्श योजनेंतर्गत शासकीय आणि अशासकीय महाविद्यालयांना सहायक अनुदान योजनेसाठी (२२०२ के ८०२) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक: संकीर्ण-२०२३ /प्र.क्र.१२२/विशि-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २७ मार्च, २०२४.

वाचा :

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्रमांक: संकीर्ण-२०२२/ प्र.क्र.२७९/ विशि-३, दि.१९ एप्रिल, २०२३.
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन ज्ञापन, क्रमांक: संकीर्ण-२०२३/ प्र.क्र.१२२/ विशि-३, दि.२७ सप्टेंबर,२०२३.
३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य पुणे यांचे पत्र क्र.यूएनआय/ परिसस्पर्श/ २०२४/ विशि-१/ १७७४, दि.१५.०३.२०२४.
४) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य पुणे यांचे पत्र क्र. यूएनआय/ परिसस्पर्श/ २०२४/ विशि-१/ १८३२, दि.१९.०३.२०२४.

**ज्ञापनः**

नॅक मुल्यांकन न केलेल्या संस्थांच्या मुल्यांकन आणि प्रमाणिकरण प्रक्रीयेत वाढ करण्यासाठी युजीसीद्वारे सुरु केलेल्या PARAMARSHA योजनेप्रमाणे राज्यस्तरावरही मेंटॉर- मेंटी योजना (परिस स्पर्श योजना) सुरु करण्याच्या व त्याच्या अंमलबजावणीबाबतच्या सूचना संदर्भ क्र.१ येथील दि.१९.०४.२०२३ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार सदर योजनेसाठी तीन वर्ष कालावधीसाठी प्रतीवर्षी रु.३.०० कोटी निधी उपलब्ध करण्यास व खर्चास विधानमंडळाने मान्यता दिली आहे. संदर्भाधीन दिनांक २७ सप्टेंबर, २०२३ च्या शासन ज्ञापनाद्वारे सदर योजनेसाठी रु.१.२० कोटी (रुपये एक कोटी वीस लक्ष फक्त) निधी वितरीत व आहरित करण्यास मंजूरी देण्यात आली आहे.

आता, संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य पुणे यांनी संदर्भ क्र. ३ व ४ येथील पत्रान्वये सदर योजनेसाठी एकूण रु. ८० लक्ष (रुपये ऐंशी लक्ष फक्त)ची मागणी केली आहे.

त्यानुषंगाने वित्त विभागाच्या मान्यतेनुसार (२२०२ के ८०२) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली रु.८०.०० लक्ष (रुपये ऐंशी लक्ष फक्त) निधी वितरीत व आहरित करण्यास मंजूरी देण्यात येत असून सदर निधी संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे.

मागणी क्र. डब्ल्यु-२,२२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०३ विद्यापीठीय व उच्च शिक्षण, १०४ अशासकीय महाविद्यालयांना व संस्थांना सहाय्य, (०३) परिस स्पर्श योजना (०३)(०१) परिस-स्पर्श योजनेंतर्गत शासकीय आणि अशासकीय महाविद्यालयांना सहायक अनुदान (राज्य स्तरीय योजना) (२२०२ के ८०२) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, पुणे आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सहायक संचालक (लेखा), उच्च शिक्षण संचालनालय, पुणे यांना घोषित करण्यात येत आहे.

योजनेच्या अंमलबजावणीसाठी संबंधित विद्यापीठांनी मागणी केल्याप्रमाणे त्याप्रमाणात निधी संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संबंधित विद्यापीठांकडे सूपूर्द करावा.

संदर्भ क्र.१ येथील दि.१९.०४.२०२३ च्या शासन निर्णयामधील मुद्दा क्र.४ मध्ये आर्थिक सहाय्य प्रदान करण्याविषयी ज्या सूचना निर्गमित केल्या आहेत त्याप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित विद्यापीठाचे कुलगुरु यांची राहील.

शासनाकडून ज्या प्रयोजनार्थ अनुदान मंजूर करण्यात आले आहे. त्याच प्रयोजनार्थ निधी खर्च करण्यात आले आहे हे पाहण्याची जबाबदारी संबंधित विद्यापीठाचे कुलगुरु यांची असेल. विहित कालावधीत सदरचा खर्च पुर्णपणे करण्यात येईल याची दक्षता संबंधित विद्यापीठाने घेण्यात यावी. यासंदर्भात त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित विद्यापीठांनी संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सादर करावे.

वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र -१, मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल, महाराष्ट्र -२, नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांचेकडे तपासणीकरीता संबंधित विद्यापीठाने व संचालक, उच्च शिक्षण, उच्च शिक्षण संचालनालय, पुणे यांनी सादर केली पाहिजेत.

हे ज्ञापन, वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकानुसार व वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र. ४४२/ व्यय-५ दिनांक २२.०३.२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०३२७१७४७०६९२०८ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT MADHUKARRAO BAWISKAR

Digitally signed by AJIT MADHUKARRAO BAWISKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=deb455609479b6c7f30e7f1f9a8360c0f8600a542859e8fe229d6ea333415e8d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=99EB928028DF71EBDFCD2898E209D499192AD3899261FEAD42F7D38A3141AB69, cn=AJIT MADHUKARRAO BAWISKAR
Date: 2024.03.27 17:56:46 +05'30'

**( अ.म. बाविस्कर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
२) कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे, महाराष्ट्र.
३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य अध्यापक विकास अकादमी (एमएसएफडीए), पुणे
५) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
६) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.
७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) सदस्य सचिव, राज्य स्तरीय समिती, परिस स्पर्श योजना.
१०) नियोजन विभाग (कार्यासन १४७१/१४११), मंत्रालय, मुंबई.
११) वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/कार्यासन अर्थ-८), मंत्रालय, मुंबई.
१२) उप सचिव (विशि) / (समन्वय), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१३) अवर सचिव (अर्थसंकल्प कक्ष), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) निवड नस्ती (विशि-३)